“पंढरपूर मंदिर विकास आराखडा”
निधी वितरणाबाबत. सन २०२४-२५

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक-निधीवि- २०२४/प्र.क्र.५८/का.१४४४-अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२४

**वाचा :** १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०२३/प्र.क्र.१५/का.१४४४-अ, दि.१९.०६.२०२३.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४.
३) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. तिक्षेवि २०२३/प्र.क्र.३४/का.१४४४-अ, दि.१२.०३.२०२४

**प्रस्तावना :**

शासन निर्णय नियोजन विभाग दिनांक १९.०६.२०२३ अन्वये रुपये ७३.८५९५ कोटी किंमतीच्या “पंढरपूर मंदिर विकास आराखड्यास” मंजूरी देण्यात आली आहे. सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात तीर्थक्षेत्र विकास आराखडा योजनेच्या अंतर्गत विविध तीर्थक्षेत्र विकास आराखड्यांस उपलब्ध झालेल्या निधीमधून सदर आराखडयाकरिता जिल्हाधिकारी, सोलापूर यांना निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

“पंढरपूर मंदिर विकास आराखड्यांतर्गत” मंजूर कामे करण्यासाठी जिल्हाधिकारी, सोलापूर यांना सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरीता “मुख्य लेखाशिर्ष ५४५२ ०२११ - ५३ मोठी बांधकामे” अंतर्गत खालील कामांसाठी रुपये ८.०० कोटी इतका निधी पुढील प्रमाणे वितरीत करण्यात येत आहे:

(रुपये कोटीत)

| अ. क्र. | कामाचे नाव | आवश्यक निधी सन २०२४-२५ |
|---|---|---|
| १. | श्री विठ्ठल रुक्मिणी मंदिर व परिसर जतन/दुरूस्ती (भाग-१) | ६.०० |
| २. | मुख्य मंदिराच्या बाहेरील परिसरातील २४ परिवार देवता मंदिराची जतन/दुरूस्ती (भाग-२) | २.०० |
| | **एकूण** | **८.००** |

२. “पंढरपूर मंदिर विकास आराखड्यांतर्गत मंजूर कामांवर होणारा खर्च, “मागणी क्र. ओ-१०, लेखाशिर्ष ५४५२, पर्यटनावरील भांडवली खर्च, ०१- पर्यटनासाठी पायाभूत सुविधा, १०१ -पर्यटन केंद्र, (००) (१५) तीर्थक्षेत्र व पर्यटनस्थळ विकास आराखडा (५४५२ ०२११) कार्यक्रम (दत्तमत) ” याखाली खर्ची टाकण्यात यावा.

३. सदर प्रयोजनासाठी वर नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत झालेला प्रत्यक्ष खर्च व प्रधान महालेखापाल, मुंबई यांचे कार्यालयाने नोंदविलेला खर्च याचा ताळमेळ घालण्यात यावा. तसेच वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी शासनास तात्काळ सादर करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४४६/२०२४/व्यय-८, दि.०७/०८/२०२४, अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०८२६१५४६०९३२१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MILIND RAGHUNATH KULKARNI

Digitally signed by MILIND RAGHUNATH KULKARNI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT,
2.5.4.20=438fa70bb728385b5c81bde24450c11d5ce0d99ed18a61fb5b1685722e2c2c03, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=DB6FB8A1DB6A8793024B0C8728EB79AB35DD0CAE14DDA9621D73EA4347C7856A, cn=MILIND RAGHUNATH KULKARNI
Date: 2024.08.26 16:01:28 +05'30'

**(मिलिंद कुळकर्णी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे .

२) जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, सोलापूर

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई

२. प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर

३. जिल्हा नियोजन अधिकारी, सोलापूर

४. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर

५. कार्यासन १४२४, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

६. कार्यासन (व्यय-८, अर्थ -१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई

७. निवड नस्ती, नियोजन विभाग, का.१४४४-अ, मंत्रालय, मुंबई